श्रीमती. कल्पना संभाजी जाधव यांचा सेवाबाहय कालावधी नियमित करुन सेवाजेष्ठतेसाठी ग्राहय धरण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र. पीएसबी-०३०९/प्र.क्र.६९५/पोल ५(अ),
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक:-२५ मे, २०११

संदर्भ:- १) पोलीस उपमहानिरीक्षक (आस्थापना) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालय यांचे पत्र क्रमांक पोमस/ ५/८/से.ज्ये./जालना/२००१ दि. २५.३.२००३
२) संचालक, महाराष्ट्र पोलीस अॅकेडमी, नाशिक यांचे पत्र क्रमांक आस्था-२/ संकिर्ण/ २०११, दि. ३१.१.२०११.

प्रस्तावना :- श्रीमती. कल्पना संभाजी जाधव यांची म.लो.आ.च्या शिफारशीनुसार पोलीस उप निरीक्षक या पदावर मे १९९० च्या आदेशानुसार नियुक्ती करण्यात आली होती. दि.१९ जून, १९९० रोजी त्यांना नासिक येथील पोलीस प्रशिक्षण केंद्रावर प्रशिक्षणासाठी नेमण्यात आले होते. प्रशिक्षण काळात त्या गर्भवती असल्याने त्यांना त्रास होऊ लागला.वैद्यकिय तपासणीनंतर त्यांना दीड महिन्यांचा गर्भ मृतावस्थेत आढळला त्यामुळे त्या प्रशिक्षण पूर्ण करु शकल्या नाही. यास्तव संचालक, महाराष्ट्र पोलीस अॅकेडमी, नाशिक यांच्या दि.१.८.१९९० च्या आदेशान्वये त्यांना दि.१.८.१९९० पासून प्रशिक्षणातून मुक्त करण्यात आले व शासन पत्र दि.२६.९.१९९० नुसार त्यांना पुढील महिला पोलीस उपनिरीक्षकांचे प्रशिक्षण सत्रात प्रवेश देण्यास मंजूरी देण्यात आली. मात्र त्यानंतर त्यांना प्रशिक्षणासाठी हजर होण्याबाबत लेखी कळविण्यात आलेले नाही. त्यानंतर त्यांना दि.१.७.१९९४ अन्वये त्यांना सन १९९४-९५ च्या सत्रासाठी प्रशिक्षणास पाठविण्याची परवानगी देण्यात आली. त्यास अनुसरुन त्या दि.१.४.१९९५ पासून प्रशिक्षणास हजर झाल्या.

मुंबई पोलीस नियमतावलीतील तरतुदी लक्षात घेता श्रीमती. कल्पना संभाजी जाधव यांची जून १९९० रोजी पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्ती झाल्यानंतर त्यांना गर्भपाताची रजा देऊन त्यांना पुन्हा प्रशिक्षणास दाखल करुन घेण्याऐवजी त्यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात समाप्त करण्यात आल्या ही बाब योग्य नव्हती. त्यांना पुढील तुकडीसोबत प्रशिक्षणास पाठविणे आवश्यक असतानांही त्यांना पाठविण्यात आले नाही. यामध्ये त्यांची कोणतीही चूक दिसून येत नाही. त्यामुळे श्रीमती.कल्पना

संभाजी जाधव यांचा दि.१.८.१९९० ते दि.१.४.१९९५ हा सेवाबाहय कालावधी असाधारण रजा म्हणून मंजूर करुन सेवाजेष्टतेसाठी ग्राहय धरण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- श्रीमती. कल्पना संभाजी जाधव यांची रजेपूर्वीची सेवा ५ वर्षे इतकी झालेली नसल्याने म.ना.से.(रजा) नियम १९८१ मधील ६३ (६) मधील तरतुदीनुसार तसेच वित्त विभाग शा.नि.क्र. सेनिके १००१/१३०/सेवा-४ दि.२.६.२००३ च्या परिशिष्ट एक मधील अ.क्र.३ च्या रकाना ६ मधील अट क्र.१ शिथील करुन श्रीमती. जाधव यांचा दि.१.८.१९९० ते १.४.१९९५ हा सेवाबाहय कालावधी असाधारण रजा म्हणून मंजूर करुन सेवाजेष्ठतेसाठी ग्राहय धरण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.संदर्भ क्र.१३३/सेवा-६ दि.२७.४.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सु.ग.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग**

प्रत,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर पोलीस महासंचलाक (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई
संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक
पोलीस अधीक्षक, जालना
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-२, महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
वित्त विभाग, सेवा-६, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती / पोल-५अ

*******